**कृषि आयुक्तालय व अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयांतील गट-क संवर्गामधील पदे नामनिर्देशनाने भरण्याकरिता निवड समित्या स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन आदेश क्रमांक- कृषिआ १०२१/प्र.क्र.२५१/१६-अे**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: २७ सप्टेंबर, २०२१.

**संदर्भ**:- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक:प्रानिमं१२१६/(प्र.क्र.१२१६)/१३-अ, दिनांक १३ जून, २०१८.

२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/आस्था-४/प्र.क्र.२८/ससेवा भरती/२८५५/२०२१, दि.३१.०८.२०२१

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त दि.१३ जून, २०१८ च्या शासन निर्णयान्वये भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कार्यकक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेबाहेरील) नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड संवर्गातील पदभरतीची सविस्तर कार्यपध्दती नमूद करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील (ब) १ मध्ये राज्यस्तरीय गट-ब (अराजपत्रित), गट-क आणि गट-ड मधील पदांवर उमेदवारांची निवड करण्यासाठी सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी प्रादेशिक विभाग प्रमुख यांच्या अध्यक्षतेखाली प्रादेशिक निवड समित्या आणि विभाग प्रमुख यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय निवड समित्या स्थापन करण्यात याव्यात, अशा सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार कृषि आयुक्तालय व अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयांतील राज्यस्तरीय गट-ब (अराजपत्रित) आणि गट-क संवर्गामधील पदे नामनिर्देशनाने भरण्याकरिता निवड समित्या स्थापन करण्याचा प्रस्ताव कृषि आयुक्तालयाने शासनास सादर केला आहे. अनुषंगाने खालीलप्रमाणे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन आदेश** :-

कृषि आयुक्तालय व अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयांतील राज्यस्तरीय गट-ब (अराजपत्रित) आणि गट-क संवर्गामधील पदे नामनिर्देशनाने भरण्याकरिता खालीलप्रमाणे निवड समित्या स्थापन करण्यात येत आहेत.

अ) राज्यस्तरीय निवड समिती

| अ.क्र. | पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | अध्यक्ष |
| २ | सह संचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे | सदस्य |
| ३ | मागासवर्गीय प्रतिनिधी गट-अ | सदस्य |
| ४ | अल्पसंख्यांक प्रतिनिधी गट-अ (गट-अ उपलब्ध नसल्यास गट-ब) | सदस्य |
| ५ | सर्वसाधारण किंवा मागास प्रवर्गातील एक महिला प्रतिनिधी, गट-अ | सदस्य |
| ६ | प्रशासकीय अधिकारी (आस्था-४), कृषि आयुक्तालय, पुणे | सदस्य सचिव |

ब) प्रादेशिक निवड समिती

| अ.क्र. | पदनाम | समितीतील पद |
|---|---|---|
| १ | विभागीय कृषि सहसंचालक | अध्यक्ष |
| २ | विभागीय अधिक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| ३ | मागासवर्गीय प्रतिनिधी गट-अ | सदस्य |
| ४ | अल्पसंख्यांक प्रतिनिधी गट-अ (गट-अ उपलब्ध नसल्यास गट-ब) | सदस्य |
| ५ | सर्वसाधारण किंवा मागास प्रवर्गातील एक महिला प्रतिनिधी, गट-अ | सदस्य |
| ६ | प्रशासकीय अधिकारी | सदस्य सचिव |

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२७१६५१४०९००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

JYOTSNA SUNIL ARJUN

Digitally signed by JYOTSNA SUNIL ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=48807fd571bd08b7318f82f32c3ac18b4a938a342e23932200c3df8b0bdd4563, pseudonym=B6E9ECA936BF2C03EE8B083F338E65F7AF36F6CD, serialNumber=984B9ADBA8339F7D6208C334DDD686A8F076E25FFF19427CAAC5BD0E7F88E592, cn=JYOTSNA SUNIL ARJUN
Date: 2021.09.27 16:53:50 +05'30'

**( ज्योत्स्ना अर्जुन )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सह संचालक, (आस्थापना) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. सर्व विभागीय कृषि सह संचालक
४. सर्व संबंधित अधिकारी
५. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवड नस्ती/१६-अे.